**मृद सर्वेक्षण आणि अन्वेषण व मृद विश्लेषण रसायन प्रयोगशाळा या योजनेतील अस्थायी पदे दिनांक ०१/०३/२०२३ ते दिनांक ३१/०८/२०२३ पर्यंत पुढे चालू ठेवण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : मृदस १४२३/ प्र.क्र. ५०/१७-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १६/०३/२०२३

वाचा:-

१. कृषि विभागाचा शासन निर्णय: मृदस १४१९/प्र.क्र. ५५/ १७-अे, दि. २९/०८/२०२२.
२. कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. योचाप्र/ मृचाप्र / २०२३-२४/ आस्था-५ (निप) /६३५८, दि. २०/०२/२०२३
३. वित्त विभागाचा शासन निर्णय क्र. पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क. दि. ०८/०२/२०२३

प्रस्तावना:

कृषि विभागातील मृद सर्वेक्षण आणि अन्वेषण व मृद विश्लेषण रसायन प्रयोगशाळा या योजनेअंतर्गत ३७७ पदे निश्चित करण्यात आलेली असून, त्यापैकी २२२ स्थायी पदे वगळता उर्वरित १५५ अस्थायी पदे दिनांक २८/०२/२०२३ पर्यंत चालू ठेवण्यास संदर्भीय अ. क्र. १ येथील दि. २९/०८/२०२२ च्या शासन निर्णयान्वये मुदतवाढ देण्यात आली आहे. वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र. ३ येथील दि. ०८/०२/२०२३ च्या शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच, यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु, ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दि. ०१/०३/२०२३ ते दि. ३१/०८/२०२३ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागांना देण्यात आले आहेत. त्यानुषंगाने, कृषि विभागातील मृद सर्वेक्षण आणि अन्वेषण व मृद विश्लेषण रसायन प्रयोगशाळेतील १५५ अस्थायी पदे दिनांक ०१/०३/२०२३ पासून दिनांक ३१/०८/२०२३ पर्यंत पुढे चालू ठेवण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

मृद सर्वेक्षण आणि अन्वेषण व मृद विश्लेषण रसायन प्रयोगशाळा या योजनेतील ३७७ मंजूर पदांपैकी २२२ स्थायी पदे वगळता उर्वरीत १५५ अस्थायी पदे आकृतीबंधात समाविष्ट असल्याचे अटीस अधीन राहून सदर अस्थायी पदांना दिनांक ०१/०३/२०२३ ते दिनांक ३१/०८/२०२३ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. (सोबत विवरणपत्र जोडले आहे)

२. या प्रित्यर्थ होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या वित्तीय वर्षाकरिता मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक : डी-३
२४०२, मृद व जलसंधारण,
१०१, मृद सर्वेक्षण व चाचणी,
(००) (०२) मृद सर्वेक्षण आणि अन्वेषण व मृद विश्लेषण रसायन प्रयोगशाळा
( २४०२ ००३२)

३. हे आदेश वित्त विभागाने निर्गमित केलेल्या शासन निर्णय क्र. पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु. क. दिनांक ०८/०२/२०२३ च्या शासन निर्णयानुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३१६१७४६४४६९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by PIMPALE PRASHANT RAMESH
Date: 2023.03.16 17:53:45 +05'30'

**( प्रशांत र. पिंपळे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत :-**

१. मा. मंत्री (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
२. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/ विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
३. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
४. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
५. सह सचिव (नि.व गु.नि.) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
६. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/ नागपूर
७. कृषि संचालक (नि.व गु.नि.), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
८. कृषि संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
९. कृषि सहसंचालक (आस्थापना), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१०. सर्व विभागीय कृषि सहसंचालक
११. सर्व जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी
१२. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१३. उप संचालक ( प्रयोगशाळा), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१४. प्रशासन अधिकारी, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१५. सर्व जिल्हा शासकीय मृद सर्वेक्षण व मृद चाचणी प्रयोगशाळा
१६. वित्त विभाग (वित्तीय सुधारणा), मंत्रालय, मुंबई
१७. कार्यासन (२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
१८. कार्यासन १७-अे (निवडनस्ती), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.

**शासन निर्णय कृषि व पदुम विभाग मृदस १४२३/ प्र.क्र. ५०/ १७-अे**
**दिनांक : १६/०३/२०२३ चे सहपत्र**

**<u>विवरण पत्र</u>**

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | | | पदसंख्या |
|---|---|---|---|---|---|
| | | मूळ वेतन | ग्रेड पे | सातव्या वेतन आयोगानुसार सुधारित मॅट्रिक स्तर | |
| १ | मृद सर्वेक्षण व मृद चाचणी अधिकारी | ९३००- ३४८०० | ४६०० | एस-१६:-४४९००-१४२४०० | २३ |
| २ | कृषि पर्यवेक्षक | ९३००- ३४८०० | ४२०० | एस-१३:- ३५४००-११२४०० | १८ |
| ३ | कृषि सहाय्यक | ५२००-२०२०० | २४०० | एस-८:- २५५००-८११०० | २० |
| | | | ७ वर्षानंतर २८०० | एस-१०:-२९२००-९२३०० | |
| ४ | वरिष्ठ लिपिक | ५२००-२०२०० | २४०० | एस-८:- २५५००-८११०० | २३ |
| ५ | लिपीक | ५२००-२०२०० | १९०० | एस-६:- १९९००-६३२०० | १५ |
| ६ | अनुरेखक | ५२००-२०२०० | २००० | एस-७:- २१७००-६९१०० | ० |
| | | ५२००-२०२०० | ७ वर्षानंतर २४०० | एस-८:- २५५००-८११०० | |
| ७ | वाहन चालक | ५२००-२०२०० | १९०० | एस-६: १९९००-६३२०० | २२ |
| ८ | शिपाई | ४४४०-७४४० | १३०० | एस-१: १५०००-४७६०० | ३४ |
| | **एकूण** | | | | **१५५** |